**लेखाशिर्ष २५१५ १२३८ (मा. लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण भागातील गावांतर्गत मूलभूत सुविधा पुरविणे) अंतर्गत दिनांक १२.१०.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रद्द केलेल्या कामांच्या यादीतून कामे वगळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः विकास-२०२३/प्र.क्र.२०९/यो-६**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक: १६ मे, २०२३

वाचा:-

१) शासन निर्णय क्रमांकः विकास-२०२२/प्र.क्र.५०/योजना-६, दि.३१.०३.२०२२
२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांची दि.१८.७.२०२२, दि. २१.७.२०२२ व दि. २६.१२.२०२२ रोजीची टिप्पणी.
३) शासन निर्णय क्रमांकः विकास-२०२२/प्र.क्र.५०/भाग-३/योजना-६, दि.१६.०६.२०२२
४) शासन निर्णय क्रमांकः विकास-२०२२/प्र.क्र.५०/भाग-३/योजना-६, दि.१६.०६.२०२२
५) शासन पत्र क्रमांकः विकास-२०२२/प्र.क्र.२२७/योजना-६, दि.१९.०७.२०२२.
६) शासन पत्र क्रमांकः विकास-२०२२/प्र.क्र.२२७/योजना-६, दि.२५.०७.२०२२.
७) शासन निर्णय क्रमांकः विकास-२०२२/प्र.क्र.२२७/योजना-६, दि.१२.१०.२०२२.
८) मा. मुंबई उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांचे याचिका क्र. १३०८९/२०२२ बाबत दि. १४.०३.२०२३ रोजीचे आदेश.

**शासन निर्णय:-**

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या संदर्भाधीन क्र. २ येथील टिप्पणीन्वये दिलेल्या निर्देशास अनुसरुन संदर्भाधीन क्र. ५ व ६ येथील दि.१९.०७.२०२२ व २५.०७.२०२२ रोजीच्या पत्रान्वये लेखाशिर्ष २५१५ १२३८ (मा.लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण भागातील गावांतर्गत मूलभूत सुविधा पुरविणे) अंतर्गत दि.०१ एप्रिल, २०२१ रोजी व त्यानंतर मंजूर केलेल्या कामांपैकी ज्या कामांचे कार्यारंभ आदेश दिलेले नाहीत किंवा कार्यारंभ आदेश देऊनही कामे सुरु झालेली नाहीत, अशा सर्व कामांना स्थगिती देण्यात आलेली होती. सदर स्थगित केलेली कामे, शासन मान्यतेने संदर्भीय क्र. ७ वरील दिनांक १२.१०.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आली आहेत.

२. उपरोक्त संदर्भ क्र. ८ येथील मा. मुंबई उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठाने याचिका क्र. १३०८९/२०२२ प्रकरणी दि. १४.०३.२०२३ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरून लेखाशिर्ष २५१५ १२३८ अंतर्गत दि. १२.१०.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रद्द केलेल्या कामांमधून सोबत जोडलेल्या "विवरणपत्र -अ" मध्ये नमूद केलेली जिल्हा परिषद व सार्वजनिक बांधकाम विभाग यंत्रणेची कामे याद्वारे वगळण्यात येत आहेत.

३. सदर रद्द यादीतून वगळण्यात आलेल्या **विवरणपत्र अ** यादीतील कामांच्या बाबतीत संबंधित यंत्रणांनी सदर काम मंजुरीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधीन राहून पुढील कार्यवाही करावी. सदर कामांची मुदत **दि. ३१ मार्च २०२४** पर्यंत राहील. त्यामुळे सदर कामे मुदतीत पूर्ण करावीत. अन्यथा अशा कामांना निधी उपलब्ध करून दिला जाणार नाही.

४. सदर रद्द कामे वगळण्याची कार्यवाही करताना कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी, अन्यथा संबंधितांची जबाबदारी राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१६१२११०११२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, pseudonym=C66B420751C8769D652257224AF3DC28B2BA4FF1, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2023.05.16 17:59:28 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय,मुंबई.
३) मा. मंत्री, ग्रामविकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,१/२ , महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.
५) महालेखापाल, लेखा व परिक्षा, १/२, महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.
६) स्वीय सहायक, मा. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर

८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर

९) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, अहमदनगर

१०) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर

११) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर

१२) निवड नस्ती (का. यो-६), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय क्र. विकास-२०२३/प्र.क्र.२०९/ यो-६, दि. १६ मे, २०२३ सोबतचे "विवरणपत्र - अ"**

**(लेखाशीर्ष २५१५ १२३८ अंतर्गत रद्द केलेल्या कामातून वगळण्यात आलेल्या कामांची यादी)- जि.प. व सा.बां.वि.**

| अ.क्र. | यंत्रणा | जिल्हा | वर्ष | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | शासन निर्णयातील कामांचा क्रमांक | रक्कम रू. लक्ष |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | जि.प. | अहमदनगर | २०२१-२२ | शासन निर्णय क्र. विकास-२०२२/ प्र.क्र.५०/ यो-६, दि. ३१ मार्च, २०२२ | १ ते ६० | ५००.०० |
| २ | सा.बां. वि. | अहमदनगर | २०२१-२२ | शासन निर्णय क्र. विकास-२०२२/ प्र.क्र.५०/भाग-३/यो-६, दि. १६ जून, २०२२ | १ ते ८ | ८६५.०० |
| ३. | जि.प. | अहमदनगर | २०२१-२२ | शासन निर्णय क्र. विकास-२०२२/ प्र.क्र.५०/भाग-३/यो-६, दि. १६ जून, २०२२ | १ ते ९४ | ७३५.०० |
| | | | | | **एकूण** | **२१००.००** |